**नगर विकास विभागाच्या आस्थापनेवरील नगर रचनाकार, गट-अ व सहायक नगर रचनाकार, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बदली-५८२०/प्र.क्र.०४/२०२०/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० मार्च, २०२०.

वाचा : १) शासन पत्र क्र.बदली-५८१६/९२४/प्र.क्र.१९२/नवि-२७, दि.१६.११.२०१६.
२) शासन पत्र क्र.बदली-५८१६/९२५/प्र.क्र.१९३/नवि-२७, दि.१६.११.२०१६.
३) संचालक, नगर रचना, पुणे यांचे कार्यालयीन आदेश क्र.आस्था/नर बदल्या/वर्ग-१/प्रशा-१/६३६१, दि.३०.११.२०१६.
४) संचालक, नगर रचना, पुणे यांचे कार्यालयीन आदेश क्र.आस्था/मध्यावधी बदल्या/सनर/२०१६/प्रशा-१/६३६३, दि.३०.११.२०१६.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील परिशिष्ट-तीन, नियम ४० (१) (२) (३) (४) व परिशिष्ट-दोन मधील अटी व शर्तीनुसार उपरोक्त वाचा मधील शासन पत्र दि.१६.११.२०१६ व संचालनालयाचे आदेश दि.३०.११.२०१६ अन्वये श्री.श्या.रा.चव्हाण, नगर रचनकार आणि श्रीमती सोनाली आहेर, सहायक नगर रचनाकार यांची पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामध्ये ३ वर्षाकरीता प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आली होती. सदर प्रतिनियुक्तीचा कालावधी दि.३०.११.२०१९ रोजी संपुष्टात आला आहे.

**०२.** पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणात सध्या कार्यरत असलेले श्री.श्या.रा.चव्हाण, नगर रचनकार आणि श्रीमती सोनाली आहेर, सहायक नगर रचनाकार यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पुढील ३ वर्षांकरीता (दि.०१.१२.२०१९ ते दि.३०.११.२०२२) अथवा शासन आदेश देईल यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत कायम ठेवण्यास, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील परिशिष्ट-तीन, नियम ४० (१) (२) (३) (४) व परिशिष्ट-दोन मधील अटी व शर्तीनुसार प्रशासकीय कारणास्तव मुदतवाढ देण्यात येत आहे.

**०३.** या आदेशाचा अनुपालन अहवाल संबंधित कार्यालय / संचालक, नगर रचना, पुणे यांनी nitin.shelke@nic.in या ई-मेल पत्त्यावर तात्काळ सादर करावा.

**०४.** सदरहू आदेशाविरुध्द राजकीय दबाव आणून प्रतिनियुक्ती रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास त्याची संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

**०५.** सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२००३२०१०२२४६२०२५ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.03.20 12:31:44 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

संबंधित अधिकारी यांना,

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
९. महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे.
१०. जिल्हाधिकारी, पुणे.
११. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१३. निवडनस्ती/नवि-२७.

***